सहायक पुर्व परीक्षा - 2012



परीक्षा दि:24|06|2012

CODE : QRM

प्रश्नपुस्तिका क्रमांक

BOOKLET NO.

# प्रश्नपुस्तिका

## सामान्य क्षमता चाचणी

वेळ : $1\frac{1}{2}$ (दीड) तास

एकूण प्रश्न : 150

एकूण गुण : 300

## सूचना

(1) सदर प्रश्नपुस्तिकेत 150 अनिवार्य प्रश्न आहेत. उमेदवारांनी प्रश्नांची उत्तरे लिहिण्यास सुरुवात करण्यापूर्वी या प्रश्नपुस्तिकेत सर्व प्रश्न आहेत किंवा नाहीत याची खात्री करून घ्यावी. असा तसेच अन्य काही दोष आढळल्यास ही प्रश्नपुस्तिका समवेक्षकांकडून लगेच बदलून घ्यावी.

(2) आपला परीक्षा-क्रमांक ह्या चौकोनांत **न विसरता बॉलपेनने** लिहावा.

| परीक्षा-क्रमांक | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | ↑ केंद्राची संकेताक्षरे | | | | | | | ↑ शेवटचा अंक |

(3) वर छापलेला प्रश्नपुस्तिका क्रमांक तुमच्या उत्तरपत्रिकेवर विशिष्ट जागी उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे **न विसरता नमूद करावा.**

(4) (अ) या प्रश्नपुस्तिकेतील प्रत्येक प्रश्नाला 4 पर्यायी उत्तरे सुचविली असून त्यांना 1, 2, 3 आणि 4 असे क्रमांक दिलेले आहेत. त्या चार उत्तरांपैकी सर्वात योग्य उत्तराचा क्रमांक उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे तुमच्या उत्तरपत्रिकेवर नमूद करावा. अशा प्रकारे उत्तरपत्रिकेवर उत्तरक्रमांक नमूद करताना तो संबंधित प्रश्नक्रमांकासमोर छायांकित करून दर्शविला जाईल याची काळजी घ्यावी, **ह्याकरिता फक्त काळ्या शाईचे बॉलपेन वापरावे, पेन्सिल वा शाईचे पेन वापरू नये.**

(ब) **आयोगाने ज्या विषयासाठी मराठी बरोबर इंग्रजी माध्यम विहित केलेले आहे, त्या विषयाचा प्रत्येक प्रश्न मराठी बरोबर इंग्रजी भाषेत देखील छापण्यात आला आहे. त्यामधील इंग्रजीतील किंवा मराठीतील प्रश्नामध्ये मुद्रणदोषांमुळे अथवा अन्य कारणांमुळे विसंगती निर्माण झाल्याची शंका आल्यास, उमेदवाराने संबंधित प्रश्न पर्यायी भाषेतील प्रश्नाशी ताडून पहावा.**

(5) सर्व प्रश्नांना समान गुण आहेत. यास्तव सर्व प्रश्नांची उत्तरे द्यावीत. घाईमुळे चुका होणार नाहीत याची दक्षता घेऊनच शक्य तितक्या वेगाने प्रश्न सोडवावेत. क्रमाने प्रश्न सोडविणे श्रेयस्कर आहे पण **एखादा प्रश्न कठीण वाटल्यास त्यावर वेळ न घालविता पुढील प्रश्नाकडे वळावे.** अशा प्रकारे शेवटच्या प्रश्नापर्यंत पोहोचल्यानंतर वेळ शिल्लक राहिल्यास कठीण म्हणून वगळलेल्या प्रश्नांकडे परतणे सोईस्कर ठरेल.

(6) उत्तरपत्रिकेत एकदा नमूद केलेले उत्तर खोडता येणार नाही. नमूद केलेले उत्तर खोडून नव्याने उत्तर दिल्यास ते तपासले जाणार नाही.

(7) **प्रस्तुत परीक्षेच्या उत्तरपत्रिकांचे मूल्यांकन करताना उमेदवाराच्या उत्तरपत्रिकेतील योग्य उत्तरांनाच गुण दिले जातील. तसेच "उमेदवाराने वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरूपाच्या प्रश्नांची अचूक उत्तरेच उत्तरपत्रिकेत नमूद करावीत. अन्यथा त्यांच्या उत्तरपत्रिकेत सोडविलेल्या प्रत्येक चार चुकीच्या उत्तरांसाठी एका प्रश्नाचे गुण वजा करण्यात येतील".**

## ताकीद

**ह्या प्रश्नपत्रिकेसाठी आयोगाने विहित केलेली वेळ संपेपर्यंत ही प्रश्नपुस्तिका आयोगाची मालमत्ता असून ती परीक्षाकक्षात उमेदवाराला परीक्षेसाठी वापरण्यास देण्यात येत आहे. ही वेळ संपेपर्यंत सदर प्रश्नपुस्तिकेची प्रत/प्रती, किंवा सदर प्रश्नपुस्तिकेतील काही आशय कोणत्याही स्वरूपात प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे कोणत्याही व्यक्तीस पुरविणे, तसेच प्रसिद्ध करणे हा गुन्हा असून अशी कृती करणाऱ्या व्यक्तीवर शासनाने जारी केलेल्या "परीक्षांमध्ये होणाऱ्या गैरप्रकारांना प्रतिबंध करण्याबाबतचा अधिनियम-82" यातील तरतुदीनुसार तसेच प्रचलित कायद्याच्या तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती कमाल एक वर्षाच्या कारावासाच्या आणि/किंवा रुपये एक हजार रकमेच्या दंडाच्या शिक्षेस पात्र होईल.**

**तसेच ह्या प्रश्नपत्रिकेसाठी विहित केलेली वेळ संपण्याआधी ही प्रश्नपुस्तिका अनधिकृतपणे बाळगणे हा सुद्धा गुन्हा असून तसे करणारी व्यक्ती आयोगाच्या कर्मचारीवृंदापैकी, तसेच परीक्षेच्या पर्यवेक्षकीयवृंदापैकी असली तरीही अशा व्यक्तीविरूद्ध उक्त अधिनियमानुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती शिक्षेस पात्र होईल.**

पर्यवेक्षकांच्या सूचनेविना हे सील उघडू नये

**पुढील सूचना प्रश्नपुस्तिकेच्या अंतिम पृष्ठावर पहा**

1. जर $|2x-3|=7$, तर $x$ च्या किंमती किती ?
(1) 5, −5 (2) −2, 5 (3) 2, −2 (4) −2, −2

If $|2x-3|=7$, then what are the values of $x$ ?
(1) 5, −5 (2) −2, 5 (3) 2, −2 (4) −2, −2

2. 1% च्या निम्मे किती ?
(1) 0.05 (2) 0.005 (3) 0.02 (4) 0.2

Half of 1% is equal to :
(1) 0.05 (2) 0.005 (3) 0.02 (4) 0.2

3. दोन क्रमवार संख्यांच्या वर्गातील फरक 27 आहे. तर त्या संख्या कोणत्या ?
(1) 15, 16 (2) 14, 15 (3) 12, 13 (4) 13, 14

Difference between the squares of two serial natural numbers is 27. What are these numbers ?
(1) 15, 16 (2) 14, 15 (3) 12, 13 (4) 13, 14

4. *3*4 ही चार अंकी संख्या 12 ने पूर्ण भाग जाणारी आहे. जर * च्या दोन्ही स्थानांवर एकच अंक येत असेल तर तो अंक कोणता ?
(1) 1 (2) 2 (3) 5 (4) 4

*3*4 is a four digit number completely divisible by 12. If the same digit appears in both the places of *, find the digit.
(1) 1 (2) 2 (3) 5 (4) 4

5. एका शेतकऱ्याने ₹ 1000 उसने घेतले आणि त्यावरील ₹ 140 व्याजासहीत ते 12 हप्त्यांमध्ये परत करण्याचे कबूल केले, ज्यांत प्रत्येक हप्ता आधीच्या हप्त्यापेक्षा ₹ 10 ने कमी असेल, तर त्याचा पहिला हप्ता किती ?
(1) ₹ 175 (2) ₹ 225 (3) ₹ 125 (4) ₹ 150

A farmer borrows ₹ 1000 and agrees to repay with a total interest of ₹ 140 in 12 instalments, each instalment being less than the preceding by ₹ 10. What should be his first instalment.
(1) ₹ 175 (2) ₹ 225 (3) ₹ 125 (4) ₹ 150

6. एक विक्रेता ट्रान्झिस्टर ₹ 2500 ला खरेदी करतो. आणि दुसऱ्या व्यापाऱ्याला ₹ 2700 ला विकतो. दुसरा विक्रेता, ग्राहकाला ₹ 2800 ला विकतो. प्रत्येक विक्रीच्या वेळी 12.5% मूल्यवर्धित कर भरावा लागल्यास एकूण मूल्यवर्धित कर = .........
(1) ₹ 350 (2) ₹ 365 (3) ₹ 895 (4) ₹ 1000

A dealer purchased a transistor set for ₹ 2500 and sold it to a sub-dealer for ₹ 2700. The sub-dealer further sold it to a customer for ₹ 2800. VAT @ 12.5% is paid on every sale. Then the total tax paid is :
(1) ₹ 350 (2) ₹ 365 (3) ₹ 895 (4) ₹ 1000

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

7. सोडवा $\frac{\sqrt{7}+\sqrt{5}}{\sqrt{7}-\sqrt{5}} + \frac{\sqrt{7}-\sqrt{5}}{\sqrt{7}+\sqrt{5}} =$ ____

(1) 6 (2) 12 (3) 14 (4) 18

Solve $\frac{\sqrt{7}+\sqrt{5}}{\sqrt{7}-\sqrt{5}} + \frac{\sqrt{7}-\sqrt{5}}{\sqrt{7}+\sqrt{5}} =$ ____

(1) 6 (2) 12 (3) 14 (4) 18

---

8. सोडवा $\frac{6-2\times 3+6}{2+6\times 3-4} = \ldots$

(1) $\frac{9}{8}$ (2) $\frac{3}{10}$ (3) $\frac{3}{8}$ (4) $\frac{3}{5}$

Solve $\frac{6-2\times 3+6}{2+6\times 3-4} = \ldots$

(1) $\frac{9}{8}$ (2) $\frac{3}{10}$ (3) $\frac{3}{8}$ (4) $\frac{3}{5}$

---

9. विजयला दररोज ₹ 150 पगार मिळतो. त्यापैकी भोजनावर 2/5 खर्च होतो व राहिल्यापैकी 1/3 घरखर्च होतो. तर दररोज किती रक्कम शिल्लक राहते ?

(1) ₹ 70 (2) ₹ 60 (3) ₹ 50 (4) ₹ 90

Vijay gets payment of ₹ 150 daily. He spends 2/5th on food and 1/3rd of the remaining amount on household. How much amount does he save daily ?

(1) ₹ 70 (2) ₹ 60 (3) ₹ 50 (4) ₹ 90

---

10. एका वर्गातील 60 मुलांच्या वयाची सरासरी 11 वर्षे 5 महिने आहे. शिक्षकासह सरासरी काढली तेव्हा ती 12 वर्षे आली तर शिक्षकाचे वय काय ?

(1) 47 वर्षे (2) 34 वर्षे (3) 37 वर्षे (4) 53 वर्षे

In one class average age of 60 students is 11 years 5 months. When the same is deduced with that of a teacher, it comes to 12 years. Then what will be the age of teacher ?

(1) 47 years (2) 34 years (3) 37 years (4) 53 years

---

11. एक संख्येच्या एक नऊमांश मधून 9 वजा केले असता उत्तर 9 येते. तर ती संख्या किती असेल ?

(1) 99 (2) 81 (3) 18 (4) 162

If 9 is subtracted from $\frac{1}{9}$th of a number, the answer is 9 then what is that number ?

(1) 99 (2) 81 (3) 18 (4) 162

---

कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK

12. एक विमान 'A' या ठिकाणाहून 500 कि.मी. दूर असलेल्या 'B' या ठिकाणी 1 तासात जाते. परत येतांना तेच अंतर ते 1/2 तासात कापते. तर त्या विमानाचा सरासरी वेग किती ?

(1) 7500 कि.मी./तास (2) 700.9 कि.मी./तास
(3) 666.66 कि.मी./तास (4) 600.60 कि.मी./तास

One aeroplane covers a distance of 500 kms from place A to B in one hour. On its return it covers the same in half an hour. What is the average speed of aeroplane ?

(1) 7500 km/hr (2) 700.9 km/hr
(3) 666.66 km/hr (4) 600.60 km/hr

---

13. रमेशजवळची रक्कम रितेशजवळच्या रकमेच्या 2/3 च्या 3/10 आहे. रितेशजवळ ₹ 90 असल्यास रमेशजवळील रक्कम किती ?

(1) ₹ 38 (2) ₹ 18 (3) ₹ 80 (4) ₹ 45

Ramesh has 3/10th of two thirds of the amount had by Ritesh. If Ritesh is having ₹ 90 then how much amount does Ramesh have ?

(1) ₹ 38 (2) ₹ 18 (3) ₹ 80 (4) ₹ 45

---

14. $\frac{57.33}{63} = 0.91$ तर $\frac{5.733}{9.1} = ?$

(1) 63 (2) 0.63 (3) 6.3 (4) 0.063

$\frac{57.33}{63} = 0.91$ then $\frac{5.733}{9.1} = ?$

(1) 63 (2) 0.63 (3) 6.3 (4) 0.063

---

15. एका संख्येमध्ये त्याच संख्येचा 3/4 भाग मिळवून त्याची 4 पट केली असता येणारी संख्या 126 असेल तर ती संख्या कोणती ?

(1) 28 (2) 15 (3) 32 (4) 18

If 3/4th of a number is added to the same number and multiplied by 4, the result is 126. What is the number ?

(1) 28 (2) 15 (3) 32 (4) 18

---

16. एक संख्यामालिका 357, 363, 369, ....., अशी आहे. तर या मालिकेत येणारी 10 वी संख्या कोणती ?

(1) 411 (2) 405 (3) 413 (4) 417

A number series is written as 357, 363, 369, ....., what will be the $10^{th}$ term in this series ?

(1) 411 (2) 405 (3) 413 (4) 417

---

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

17. तीन संख्यांची सरासरी ही 60 आहे. दूसरी संख्या पहिल्या संख्येपेक्षा 6 ने मोठी आहे परंतु तिसऱ्या संख्येपेक्षा 12 ने लहान आहे. तर दूसरी संख्या कोणती ?

(1) 52 (2) 58 (3) 60 (4) 48

The average of three numbers is 60. The second number is greater than the first by 6 but smaller than the third by 12. Find the second number.

(1) 52 (2) 58 (3) 60 (4) 48

18. शिरीन, मारीया पेक्षा 3 वर्षांनी लहान आहे. दोन वर्षानंतर त्यांच्या वयाचे प्रमाण 5 : 6 होईल तर शिरीनचे आजचे वय काय ?

(1) 13 वर्षे (2) 15 वर्षे (3) 14 वर्षे (4) 16 वर्षे

Shirin is 3 years younger to Maria. After 2 years the ratio of their ages will be 5 : 6. How old is Shirin today ?

(1) 13 years (2) 15 years (3) 14 years (4) 16 years

19. $(13) \times (-5) - (-96) \div (2) + 20 = \ldots$ ?

(1) 3 (2) 4 (3) 5 (4) 6

$(13) \times (-5) - (-96) \div (2) + 20 = \ldots$ ?

(1) 3 (2) 4 (3) 5 (4) 6

20. भारती आणि आनंद यांच्यामधील अंतर 180 कि.मी.आहे. ते एकमेकांच्या दिशेने अनुक्रमे ताशी 10 कि.मी. व ताशी 20 कि.मी. वेगाने धावू लागले, तर किती तासानंतर ते एकमेकास भेटतील ?

(1) 5 (2) 6 (3) 4 (4) 7

Bharati and Anand are 180 kms. apart. They start running simultaneously towards each other at a speed of 10 km/hr and 20 km/hr respectively. In how many hours will they meet ?

(1) 5 (2) 6 (3) 4 (4) 7

21. ऑर्निथॉलॉजी म्हणजे काय ?

(1) पक्ष्यांचा अभ्यास (2) हाडांचा अभ्यास

(3) पृथ्वीचा अभ्यास (4) वरीलपैकी काहीही नाही

What is Ornithology ?

(1) Study of birds (2) Study of bones

(3) Study of earth (4) None of the above

22. खालीलपैकी कोणते मूलद्रव्य हे सूक्ष्मपोषद्रव्य आहे ?

(1) फॉस्फरस (2) जस्त (3) नत्र (4) गंधक

From those given below which element is a Micronutrient ?

(1) Phosphorous (2) Zinc (3) Nitrogen (4) Sulphur

---

23. हायग्रोमीटर काय मोजते ?

(1) सापेक्ष आर्द्रता (2) द्रवांची सापेक्ष घनता

(3) नदीच्या पात्रातील प्रवाह (4) वरील काहीही नाही

What does hygrometer measure ?

(1) Relative humidity (2) Relative density of liquids

(3) The water flow of a river (4) None of the above

---

24. व्यक्तीला ताप आल्यास साध्या पाण्याच्या कापडी घड्याऐवजी मीठाच्या पाण्याच्या कापडी घड्या का वापरतात ?

(1) मीठ + पाणी → उष्माग्राही क्रिया

(2) मीठ + पाणी → उष्मादायी क्रिया

(3) मीठ व पाणी सहज उपलब्ध असते

(4) मीठ पाण्यात सहज विरघळते.

Why do we use cloth strips dipped in salt water instead of those dipped in normal water when a person has a fever ?

(1) Salt + water → endothermic reaction

(2) Salt + water → exothermic reaction

(3) Salt and water are easily available

(4) Salt dissolves in water easily.

---

25. फायलेरिअसिस हा रोग कोणत्या वर्गामध्ये मोडतो ?

(1) प्रदेशनिष्ठ रोग (2) व्यापक रोग

(3) सार्वदेशिक रोग (4) संक्रामक रोग

To which class does the disease Filariasis belong ?

(1) Endemic diseases (2) Epidemic diseases

(3) Pandemic diseases (4) Communicable diseases

---

26. नैसर्गिक सूक्ष्मजैविक वनस्पतींचे नुकसान कशामुळे होते ?

(1) सेंद्रिय शेतीमुळे (2) जलसिंचनामुळे

(3) कंपोस्ट खतांमुळे (4) रासायनिक खतांमुळे

What harms the natural microbial flora ?

(1) organic farming (2) irrigation

(3) compost (4) chemical fertilizers

---

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

27. खाली दिलेल्या विधानांमध्ये चुकीचे विधान कोणते आहे ?

(1) मधुमेह झालेल्या व्यक्तिच्या मुत्रातील ग्लुकोजचे प्रमाण ठरविण्यासाठी कॉपर सल्फेट वापरतात.

(2) शाई तयार करण्यासाठी फेरस सल्फेट चा उपयोग करतात.

(3) प्रयोगशाळेत उपकरणे वाताभेद्य करण्यासाठी कॅल्शिअम कार्बोनेट वापरतात.

(4) पाणी निर्जंतुक करण्यासाठी विरंजक चूर्ण वापरतात.

Which of the following statements is a wrong statement ?

(1) Copper sulphate is used to determine sugar in the urine of diabetic person.

(2) Ferrous sulphate is used in the preparation of ink.

(3) Calcium carbonate is used in laboratories for sealing air gaps in apparatus.

(4) Bleaching powder is used for disinfecting drinking water.

---

28. फुफ्फुसाचे मुख्य कार्य कोणते ?

(1) रक्त पुरवठा (2) रक्ताचे शुद्धीकरण

(3) पचनप्रक्रियेस मदत (4) पचन झालेले अन्न साठवणे

What is the main function of lungs ?

(1) Supply blood (2) Purify blood

(3) Help in digestion (4) Store digested food

---

29. मूलद्रव्यांची समस्थानिके म्हणजे :

(1) अणुक्रमांक सारखा परंतु अणुवस्तुमानांक भिन्न.

(2) अणुवस्तुमानांक सारखा परंतु अणुक्रमांक भिन्न.

(3) अणुक्रमांक सारखा व अणुवस्तुमानांक सारखा.

(4) वरीलपैकी एकही नाही

Isotopes of an element have :

(1) same atomic number but different atomic mass number.

(2) same atomic mass number but different atomic number.

(3) same atomic number and same atomic mass number.

(4) none of the above

---

कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK

30. एखादा पदार्थ उर्ध्व दिशेने फेकला असतांना त्याची :
(1) गतिज ऊर्जा वाढत असते व स्थितिज ऊर्जा कमी होत जाते.
(2) गतिज ऊर्जा कमी होत जाते व स्थितिज ऊर्जा वाढत जाते.
(3) गतिज ऊर्जा व स्थितिज ऊर्जा दोन्ही वाढतात.
(4) गतिज ऊर्जा व स्थितिज ऊर्जा दोन्ही कमी होत जातात.

When body is thrown in upward direction then :
(1) Kinetic energy goes on increasing and simultaneously potential energy decreases.
(2) Kinetic energy goes on decreasing and simultaneously potential energy increases.
(3) Kinetic energy and potential energy both increase.
(4) Kinetic energy and potential energy decrease.

---

31. कोणता धातू लोखंडाचे गंजणे रोखतो ?
(1) तांबे (2) ॲल्युमिनिअम (3) सिल्वर (4) जस्त

Which metal prevents the rusting of iron ?
(1) Copper (2) Aluminium (3) Silver (4) Zinc

---

32. कांदे, बटाटे यांना कोंब फुटू नयेत यासाठी कोणत्या किरणांचा मारा करतात ?
(1) अल्फा (2) बीटा (3) गॅमा (4) यु.व्ही.

Which radiations are used to prevent sprouting of onions or potatoes ?
(1) Alpha (2) Beta (3) Gamma (4) U.V.

---

33. खालीलपैकी जीवाश्म इंधन कोणते ?
(1) पेट्रोलिअम (2) मेण (3) बायोडिझेल (4) लाकूड

Which of the following is a fossil fuel ?
(1) Petroleum (2) Wax (3) Biodiesel (4) Wood

---

34. DOTS हा उपचार कोणत्या रुग्णांसाठी आहे ?
(1) पोलिओ (2) एडस् (3) हेपॅटिटिस (4) क्षय

To which patients is DOTS treatment given ?
(1) Polio (2) AIDS (3) Hepatitis (4) Tuberculosis

---

35. किटकनाशक आणि रोगनाशक द्रव्य खालीलपैकी कोणत्या वनस्पतीपासून मिळविता येते ?
(1) कडूलिंब (2) जॅट्रोफा (3) बेशरम (4) वरील सर्व

From which botanical species pesticides for the control of pests and diseases be obtained ?
(1) Neem (2) Jatropha (3) Ipomoea (4) All the above

---

कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK

36. "प्रत्येक क्रियेकरता तेव्हढीच व विरूद्ध प्रतिक्रिया असते". हा कोणता सिद्धान्त/नियम आहे?

(1) बॉइल्स्‌चा नियम (2) आर्किमिडिजचा सिद्धांत
(3) न्यूटनचा गतीचा दुसरा नियम (4) यापैकी कोणताही नाही

"To every action there is an equal and opposite reaction". Which law is this ?

(1) Boyle's Law (2) Archimedes' Principle
(3) Newton's II law of motion (4) None of the above

---

37. यू डी कोलोन वापरल्याने आपणास हायसे कां वाटते?

(1) वाष्पीभवनाने गारवा मिळतो
(2) ते कापलेला भाग बरा करते
(3) ते माश्यांना त्वचेवर बसू देत नाही
(4) वरीलपैकी काहीही नाही

Why do we feel good after applying eau - de - cologne ?

(1) Evaporation brings in cooling effect
(2) The cut gets heeled
(3) It does not allow flies to sit on the surface
(4) None of the above

---

38. खाली काही अन्ननाशक प्रक्रिया दिल्या आहेत.

(a) मांसाची चव बिघडणे.
(b) केळ्याची साल काळी पडणे.
(c) साठवण केल्यावर द्राक्षाची चव जाणे.

या सर्व अन्ननाशक प्रक्रियांना जबाबदार घटक कोणता आहे?

(1) अंतर्घटक (2) सूक्ष्मजीवांची वाढ (3) विकारात्मक (4) ऑक्सिडीकरण

The following are some examples of food spoilage :

(a) Meat becomes unpalatable.
(b) Blackening of banana skin.
(c) On storage, grapes lose their taste.

Which of the following factors is responsible for all these spoilages ?

(1) Instrinsic (2) Microbial growth (3) Enzymatic (4) Oxidation

---

39. जेंव्हा द्रावणाचे pH मूल्य 7 असते तेंव्हा द्रावण हे कसे असते?

(1) आम्लधर्मीय असते (2) आम्लारी धर्मीय असते
(3) उदासीन असते (4) संमिश्र असते

When pH value of a solution is 7 then what is the nature of that solution ?

(1) Acidic (2) Alkaline
(3) Neutral (4) Mixture

---

40. आकाश निळे दिसण्यामागचे कारण कोणते ?
   (1) ते खरोखर निळे आहे.
   (2) वातावरण अन्य रंगांपेक्षा निळ्या रंगाचे विकिरण जास्त करते.
   (3) सर्व रंगांचे व्यतिकरण होऊन निळा रंग मिळतो.
   (4) श्वेत प्रकाशात निळा रंग जास्त प्रभावी वाटतो.

   Why does sky appear blue ?
   (1) It is actually blue.
   (2) The atmosphere scatters blue colour more than the other colours.
   (3) All colours interfere to produce blue.
   (4) In white light the blue component dominates.

---

41. सायमन कमिशनची स्थापना कशाकरता करण्यात आली होती ?
   (1) मॉंटेग्यू-चेम्सफोर्ड कायद्याने केलेल्या सुधारणांचे मूल्यमापन करण्यासाठी
   (2) मिंटो मोर्ले कायद्याने केलेल्या सुधारणांचे मूल्यमापन करण्यासाठी
   (3) पुणे कराराच्या प्रभावाचे मूल्यमापन करण्यासाठी
   (4) वरीलपैकी कशासाठीही नाही.

   What was the Simon Commission appointed for ?
   (1) for evaluating implementation of the Montague Chelmsford Act
   (2) for evaluating implementation of the Minto Morley Act
   (3) for evaluating impact of the Poona Pact
   (4) None of the above

---

42. मुडिमन समिती का नेमण्यात आली होती ?
   (1) इ.स. 1919 च्या कायद्याची चौकशी करण्यासाठी.
   (2) इ.स. 1909 च्या कायद्याची चौकशी करण्यासाठी.
   (3) द्विदल राज्यपद्धतीच्या चौकशीसाठी
   (4) जालियनवाला बाग हत्याकांडाची चौकशी करण्यासाठी.

   What was the Mudiman Committee appointed for ?
   (1) Enquiry about the Act, 1919
   (2) Enquiry about the Act, 1909
   (3) Enquiry about the Dyarchy
   (4) Enquiry about the Jallianwala Bagh Tragedy

---

43. महात्मा गांधींच्या नेतृत्वाखाली शेतकऱ्यांनी 1918 मध्ये 'सारा बंदी' ची चळवळ कोणत्या जिल्ह्यात सुरु केली ?
   (1) गोरखपूर (2) सोलापूर (3) खेडा (4) पुणे

   In which district in 1918 the peasants started no tax movement under the leadership of Mahatma Gandhi ?
   (1) Gorakhpur (2) Solapur (3) Kheda (4) Pune

---

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

44. डॉ. आंबेडकरांचे कोणते लिखाण **नाही** ?
(1) दि प्रॉब्लेम ऑफ रूपी.
(2) रिडल्स् इन हिंदूइझम
(3) गांधी अँड दि फायनांशियल थॉटस् ऑन लिंग्युइस्टिक स्टेट
(4) वरील एकही पर्याय बरोबर नाही

What has Dr. Ambedkar **not** authored ?
(1) The Problem of Rupee
(2) Riddles in Hinduism
(3) Gandhi and the Financial thoughts on linguistic state
(4) None of the above options is correct.

---

45. गो. ग. आगकरांच्या बाबतीत कोणते विधान **खरे** आहे ?
(a) त्यांच्यावर चिपळूणकरांचा प्रभाव होता.
(b) टिळकांशी सामाजिक सुधारणांवर झालेल्या मतभेदामुळे त्यांनी केसरीचा राजीनामा दिला.
(c) त्यांनी शेक्सपिअरच्या हॅम्लेटचे मराठीत भाषांतर केले.
(d) ते देव न मानणाऱ्यांपैकी होते

(1) (a), (b) व (c)
(2) (b), (c) व (d)
(3) वरील सर्व
(4) वरीलपैकी एकही नाही

Which statements are **true** about G. G. Agarkar ?
(a) He was influenced by Chiplunkar
(b) He left Kesari as he developed differences with Tilak on Social Reforms
(c) He translated Shakespeare's Hamlet into Marathi
(d) He was an atheist

(1) (a), (b) & (c)
(2) (b), (c) & (d)
(3) All the above
(4) None of the above

---

46. कोणत्या देशातील प्रतिक्रियेमुळे भारतात खिलाफत चळवळ सुरु झाली ?
(1) इंग्लंड (2) जर्मनी (3) ब्रह्मदेश (4) तुर्कस्तान

As a result of the reaction in which country was the Khilafat movement started in India ?
(1) England (2) Germany (3) Brahmadesh (4) Turkastan

---

47. 1902 मध्ये सरकारी नोकऱ्यात मागासवर्गीयांसाठी जागा राखून ठेवण्याचा क्रांतिकारी निर्णय कोणी घेतला ?
(1) डॉ. बाबासाहेब आंबेडकर
(2) महात्मा गांधी
(3) आर. डी. कर्वे
(4) छत्रपती शाहू महाराज

Who took the revolutionary decision in 1902 to keep the vacancies reserved for the backward classes in Government jobs ?
(1) Dr. Babasaheb Ambedkar
(2) Mahatma Gandhi
(3) R. D. Karve
(4) Chhatrapati Shahu Maharaj

---

48. प्रार्थना समाजाबाबत कोणत्या बाबी **बरोबर** आहेत ?
   (a) प्रार्थना समाजाची स्थापना तर्खडकर बंधूंनी केली.
   (b) समाजाने सुबोध पत्रिका मुखपत्र चालवले.
   (c) वारसा भागवत धर्मातून घेतल्याचे मानतो.
   (d) हिन्दूत्वाचा प्रगतीच्या प्रवृत्तीशी मेळ घातला.

   (1) (a), (b), (c)  (2) (a), (b), (d)
   (3) (b), (c), (d)  (4) (a), (b), (c), (d)

   What is **true** about Prarthana Samaj ?
   (a) It was founded by Tarkhadkar brothers.
   (b) Subodh Patrika was it's mouth piece.
   (c) Has roots in Bhagwat Dharma.
   (d) Brought along progressive attitudes in Hinduism.

   (1) (a), (b), (c)  (2) (a), (b), (d)
   (3) (b), (c), (d)  (4) (a), (b), (c), (d)

---

49. घटनांचा कालानुक्रमाने क्रम लावा.
   (a) स्वदेशी चळवळ  (b) खिलाफत चळवळ
   (c) सविनय कायदेभंग चळवळ  (d) चलेजाव चळवळ

   (1) (b), (a), (d), (c)  (2) (b), (c), (d), (a)
   (3) (d), (b), (a), (c)  (4) (a), (b), (c), (d)

   Arrange chronologically :
   (a) Swadeshi Movement  (b) Khilafat Movement
   (c) Civil Disobedience Movement  (d) Quit India Movement

   (1) (b), (a), (d), (c)  (2) (b), (c), (d), (a)
   (3) (d), (b), (a), (c)  (4) (a), (b), (c), (d)

---

50. लॉर्ड मिंटो यांच्या प्रोत्साहनामुळे कोणती संघटना 1906 मध्ये स्थापन झाली ?
   (1) राष्ट्रीय काँग्रेस  (2) सार्वजनिक सभा
   (3) मुस्लिम लिग  (4) आझाद हिंद सेना

   Which organisation was founded in 1906 with the encouragement of Lord Minto ?
   (1) National Congress  (2) Sarvajanik Sabha
   (3) Muslim League  (4) Azad Hind Sena

---

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

51. स्वतंत्र मजूर पक्षाबाबत काय **खरे** नाही ?
(a) तो डॉ. आंबेडकरांनी स्थापन केला.
(b) 'जनता' या पक्षाचे मुखपत्र होते.
(c) काबाडकष्ट करणाऱ्यांचे हित पक्षाने जोपासले.
(d) पक्षाने 1937 च्या निवडणुका लढविल्या.
(e) पक्ष अखिल भारतीय शेड्यूल्ड कास्ट फेडरेशन मध्ये विलीन झाला.

(1) (b) (2) (c) (3) (d) (4) (e)

What is **not** true of Swatantra Labour Party ?
(a) It was established by Dr. Ambedkar
(b) 'Janta' was its mouth piece.
(c) Interests of the labourers was its agenda
(d) The party contested 1937 elections
(e) It merged into All India Scheduled Caste Federation.

(1) (b) (2) (c) (3) (d) (4) (e)

---

52. सायमन कमिशनने कोणत्या शिफारशी केल्या होत्या ?
(1) एकूण लोकसंख्येच्या 10 ते 15 टक्के लोकांना मताधिकार मिळावा.
(2) केन्द्रात द्विदल शासनपद्धतीचा स्वीकार करु नये.
(3) प्रांतामधील द्विदल शासनपद्धती रद्द करण्यात यावी.
(4) वरीलपैकी सर्व.

What was the recommendation of the Simon Commission ?
(1) Out of the total population of India 10 - 15% should have the right to vote.
(2) There should be no Dyarchy in the Central Legislative Assembly.
(3) Dyarchy be discontinued in the provinces
(4) All of these

---

53. ब्राम्हणेतर व सत्यशोधक चळवळीतील फरक कोणता ?
(a) ब्राम्हणेतर राजकीय तर सत्यशोधक सामाजिक व धार्मिक चळवळ होती.
(b) ब्राम्हणेतरमध्ये मराठा तर सत्यशोधकमध्ये माळी जातीचे वर्चस्व होते.
(c) ब्राम्हणेतर, दिनकर जवळकर व इतरांच्या तर सत्यशोधक, महात्मा फुलेंच्या विचारांवर आधारित होती.

(1) (a) व (b) (2) (a) व (c) (3) (b) व (c) (4) (a), (b) व (c)

Differentiate between Non-Brahmin and Satyashodhak movements.
(a) Non-Brahmin was political while Satyashodhak was a social and religious movement.
(b) Non-Brahmin movement was dominated by Marathas while Satyashodhak was dominated by Malis
(c) Non-Brahmin was based on thoughts of Dinkar Javalkar and others, while Satyashodhak was based on thoughts of Mahatma Phule

(1) (a) & (b) (2) (a) & (c) (3) (b) & (c) (4) (a), (b) & (c)

---

54. शाहू महाराजांनी काय केले **नाही** ?
(a) प्राथमिक शिक्षण सक्तीने करण्यास जाहीरनामा.
(b) शिक्षणात स्त्रियांना फी माफी.
(c) प्रथम सहाय्य करून नंतर क्रांतिकारकांना उघड मदत केली नाही.

(1) (a) (2) (b)
(3) (c) (4) वरीलपैकी कोणताही पर्याय योग्य नाही

What can **not** be attributed to Shahu Maharaj ?
(a) Issued proclamation for compulsory Primary Education.
(b) Announced fee relaxation to women in Educational institutions.
(c) Did not help openly the freedom fighters later though initially he did help.

(1) (a) (2) (b)
(3) (c) (4) None of the above options is correct

55. बिहारमधील चंपारण्य येथील सत्याग्रह कोणत्या पिकाशी निगडीत होता ?
(1) भात (2) ज्यूट (3) नीळ (4) ऊस

With which crop was the Champaran Satyagraha related ?
(1) rice (2) jute (3) indigo (4) sugar cane

56. सन 1942 ची चळवळ अयशस्वी कां झाली ?
(a) ब्रिटीश सरकारपुढे निशस्त्र लोकांचा निभाव लागणे कठीण होते.
(b) चळवळीपूर्वीच सरकारने गांधींना अटक केली.
(c) सरकारी नोकरीत असलेल्यांनी चळवळीत भाग घेतला नाही
(d) मुस्लीम लीगने चळवळीस पाठिंबा दिला नाही

(1) (a), (b) व (c) (2) (b), (c) व (d)
(3) (b) व (c) (4) (a), (b), (c) व (d)

Why was 1942 movement unsuccessful ?
(a) Unarmed people could not succeed against the British Government.
(b) Gandhi was arrested prior to the movement
(c) Those in service did not join the movement
(d) Muslim league did not support the movement

(1) (a), (b) & (c) (2) (b), (c) & (d)
(3) (b) & (c) (4) (a), (b), (c) & (d)

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

57. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना कोणत्या विद्यापीठाने पी.एच्.डी. प्रदान केली ?
(1) लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स (2) बोस्टन विद्यापीठ
(3) कोलंबिया विद्यापीठ (4) केंब्रिज विद्यापीठ

Which university bestowed Ph.D. on Dr. Babasaheb Ambedkar ?
(1) London School of Economics (2) Boston University
(3) Columbia University (4) Cambridge University

---

58. आधुनिक भारतातील स्त्री शिक्षणाचे जनक कोणाला म्हणतात ?
(1) सावित्रीबाई फुले (2) वि. रा. शिंदे
(3) लोकमान्य टिळक (4) महात्मा ज्योतिबा फुले

Who is called as the pioneer of women's education of Modern India ?
(1) Savitribai Phule (2) V. R. Shinde
(3) Lokmanya Tilak (4) Mahatma Jyotiba Phule

---

59. पुणे कराराबाबत कोणती विधाने **बरोबर** आहेत ?
(a) बाबासाहेब आंबेडकर व महात्मा गांधी यांच्यात तो झाला.
(b) आंबेडकरांची स्वतंत्र मतदार संघाची मागणी मान्य झाली.
(c) अस्पृश्यांसाठी राखीव जागा देण्यात आल्या.

(1) (a), (b) (2) (a), (c)
(3) (b), (c) (4) वरील तिन्हीं

Which statements about Pune pact are **correct** ?
(a) It was signed between Dr. Babasaheb Ambedkar and Mahatma Gandhi.
(b) The demand for independent constituencies as suggested by Dr. Ambedkar was accepted.
(c) Constituencies were reserved for lower castes.

(1) (a), (b) (2) (a) , (c)
(3) (b), (c) (4) all the three above

---

60. अमेरिका व कॅनडा स्थित भारतीयांनी कोणती संघटना स्थापन केली ?
(1) इंडिया हाऊस (2) गदर
(3) हिंदुस्थान सोशॅलिस्ट रिपब्लिकन आर्मी (4) मित्रमेळा

Which organisation was established by the Indians living in America and Canada ?
(1) India House (2) Gadar
(3) Hindustan Socialist Republican Army (4) Mitramela

---

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

61. स्वामी दयानंदांच्या आर्य समाजाचे वर्णन 'लढाऊ हिंदु धर्म' (Aggressive Hinduism) असे कोणी केले ?

(1) सरोजिनी नायडू (2) भगिनी निवेदिता

(3) ॲनी बेझंट (4) वरील सर्व

Who described Dayanand Saraswati's Arya Samaj as "Aggressive Hinduism" ?

(1) Sarojini Naidu (2) Bhagini Nivedita

(3) Annie Beasant (4) All of these

---

62. क्रिप्स योजना काँग्रेसने का नाकारली ?

(1) मुस्लिम लीगने क्रिप्स मिशनला पाठींबा दिला होता.

(2) भारतातील कोणताही राजकीय पक्ष क्रिप्स योजनेबाबत समाधानी नव्हता.

(3) क्रिप्स योजनेत पाकिस्तान निर्मितीचा समावेश होता.

(4) वरीलपैकी कोणताही पर्याय योग्य नाही.

Why did the Congress reject the Cripps plan ?

(1) Muslim League supported the Cripps mission.

(2) No political party in India was satisfied with it.

(3) These proposals included creation of Pakistan.

(4) None of the above options is correct.

---

63. 1857 च्या उठावास काय कारणीभूत झाले ?

(a) डलहौसीचे आक्रमक धोरण (b) सामाजिक व धार्मिक जीवनातील हस्तक्षेप

(c) सैनिकांतील असंतोष (d) कंपनी काळातील राज्यविस्तार

(1) (a) व (b) (2) (b) व (c) (3) (a), (b) व (c) (4) (a), (b), (c) व (d)

What led to the revolt of 1857 ?

(a) Dalhousie's aggressive policy

(b) Interference in social and religious life

(c) Unrest in the sepoys

(d) 'East India Company's extent of power.

(1) (a) & (b) (2) (b) & (c) (3) (a) , (b), & (c) (4) (a), (b), (c) & (d)

---

कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK

64. 1920 च्या असहकार चळवळीला काय प्रेरक होते ?

(a) पहिल्या महायुद्धाने वाढलेली महागाई.

(b) सरकारच्या कायद्याने व्यक्ती व व्यक्तीस्वातंत्र्यावर घातलेल्या मर्यादा.

(c) ब्रिटिशांच्या विरोधातील असंतोष.

(d) खिलाफत प्रश्नामुळे ब्रिटीश विरोधी मुस्लीम समाज.

(1) (a), (b) (2) (b), (c) (3) (a), (b), (c) (4) (a), (b), (c), (d)

What fuelled the 1920 Non Cooperation Movement ?

(a) Rise in prices/inflation due to World War I.

(b) Limitation imposed by law on personal independence.

(c) Discontent against British.

(d) Muslim Opposition to the British due to Khilafat issue.

(1) (a), (b) (2) (b), (c) (3) (a), (b), (c) (4) (a), (b), (c), (d)

---

65. भारतमंत्र्याचा पगार इंग्लडच्या तिजोरीतून देण्याची तरतूद कोणत्या सुधारणा कायद्यात करण्यात आली ?

(1) 1892 चा कायदा (2) 1909 चा कायदा

(3) 1919 चा कायदा (4) 1935 चा कायदा

In which Reformation Act was a provision for the payment of salary of the Secretary of State for India from British revenues made ?

(1) Act of 1892 (2) Act of 1909

(3) Act of 1919 (4) Act of 1935

---

66. लॉर्ड कर्झनने बंगालची फाळणी कशासाठी केली ?

(a) प्रशासनाच्या सोयीसाठी

(b) राष्ट्रीय चळवळ दडपण्यासाठी

(c) अन्य भाषिक प्रदेश (बिहार, ओरिसा) वेगळा काढण्यासाठी

(1) (a), (b) (2) (b), (c) (3) (a), (c) (4) (a), (b), (c)

For what did Lord Curzon partition Bengal ?

(a) Administrative convenience

(b) To curb nationalist movement

(c) To separate other linguistic areas. (Bihar, Orissa)

(1) (a), (b) (2) (b), (c) (3) (a), (c) (4) (a), (b), (c)

---

67. आझाद हिंद सेनेची स्थापना सुलभ कशाने झाली ?

(1) दुसऱ्या महायुद्धात ब्रिटिश संकटात सापडल्याने

(2) पहिल्या महायुद्धातील ब्रिटीशांचा प्रभाव

(3) बंगालची फाळणी

(4) वरीलपैकी एकही नाही

What facilitated establishment of Azad Hind Sena ?

(1) The precarious situation of the British in the Second World War

(2) The influence of the British in the First World War

(3) Partition of Bengal

(4) None of the above

---

68. जोतिबा फुलेंबाबत काय **खरे** नाही ?

(a) जोतिबांच्या यात्रेदिवशी जन्म म्हणून नांव जोतिबा.

(b) आजोबांचा फुलांचा व्यवसाय म्हणून आडनांव फुले.

(c) राइटस् ऑफ मॅन या थॉमस पेनच्या ग्रंथाचा त्यांच्यावर प्रभाव होता.

(d) विष्णूशास्त्री चिपळूणकर त्यांचे टीकाकार होते

(e) त्यांना मराठी, इंग्रजी, उर्दू, कन्नड, तामीळ, गुजराती भाषा येत

(f) विद्येविना अनर्थ हे त्यांनी प्रामुख्याने जाणले.

(1) (a) व (b)
(2) (b) व (d)
(3) (e) व (f)
(4) सर्व विधाने खरी आहेत.

Which statements regarding Jotiba Phule are **incorrect** ?

(a) Named Jotiba as he was born on Jotiba Procession day.

(b) His surname "Phule" was drawn from the profession of his grand father.

(c) Thomas Pen's "Rights of Man" had profound impact on him

(d) Vishnushastri Chiplunkar was his critique

(e) He knew Marathi, English, Urdu, Kannada, Tamil, Gujrati languages.

(f) "Lack of Education is the root cause of all the trouble" he firmly believed in.

(1) (a) & (b)
(2) (b) & (d)
(3) (e) & (f)
(4) All the statements are correct

---

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

69. काँग्रेसने सायमन कमिशनचा निषेध कां केला ?

(1) काँग्रेसला सुधारणा समितीत प्रतिनिधित्व नव्हते

(2) मुस्लिम लीगला प्रतिनिधित्व होते

(3) संपूर्ण स्वातंत्र्य दिले गेले नव्हते

(4) ब्रिटिशांनी "तोडा/फोडा व राज्य करा" नीती वापरली

Why did Congress boycott Simon Commission ?

(1) Congress was not represented in the reforms committee.

(2) Muslim league was represented in it.

(3) Complete independence was not granted

(4) The British had adopted the policy of divide & rule

---

70. संपूर्ण स्वराज्याचा ठराव राष्ट्रीय सभेच्या कुठल्या अधिवेशनात संमत करण्यात आला ?

(1) लखनौ (2) मुंबई (3) लाहोर (4) सुरत

In which National Congress session was the resolution of Complete Independence passed ?

(1) Lucknow (2) Mumbai (3) Lahore (4) Surat

---

71. जे. एस. मिल व एच. स्पेन्सर यांच्या लिखाणाने प्रभावित झालेले समाज सुधारक कोण ?

(1) महात्मा फुले (2) महर्षी कर्वे

(3) गोपाळ गणेश आगरकर (4) न्यायमूर्ती रानडे

Which Social Reformer was inspired by the writings of J. S. Mill and H. Spencer ?

(1) Mahatma Phule (2) Maharshi Karve

(3) Gopal Ganesh Agarkar (4) Justice Ranade

---

72. वैयक्तिक सत्याग्रहात काय आग्रह धरला जात होता ?

(1) दुसऱ्या महायुद्धात सामील होण्याचा (2) दुसऱ्या महायुद्धात सामील न होण्याचा

(3) परदेशी वस्तूंचा बहिष्कार (4) उपरोक्त कशाचाही नाही.

Individual Civil Disobedience movement extorted people to :

(1) Join the Second World War (2) Not to join the Second World War

(3) Boycott foreign goods (4) None of the above

---

